**श्री. अखिल नित्यानंद शेंडे, प्रशासकीय अधिकारी, गट-अ यांना पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कृषिआ १०२३/प्र.क्र.५६/१६अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
दिनांक : २८ जून, २०२३

<u>संदर्भ</u> १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि.१७.१२.२०१६
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृषिआ १०२०/प्र.क्र.९५/१६-अे, दि.२४.०४.२०२०
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. कृषिआ १०२१/प्र.क्र.७०/१६-अे, दि.२९.१२.२०२१

**शासन आदेश -:**

श्री. अखिल नित्यानंद शेंडे, प्रशासकीय अधिकारी, गट-अ यांना संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रतिनियुक्तीने वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर येथील वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, गट-अ या रिक्त पदावर लगतच्या निम्न संवर्गातून प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात आली होती. तद्नंतर श्री. शेंडे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर १ वर्षापेक्षा अधिकचा कालावधी झालेला असल्यामुळे व त्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि. १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील अ.क्र.५. (अ)(३) नुसार सक्षम प्राधिकरणाने मुदतवाढ दिलेली नसल्यामुळे श्री. शेडे यांच्या पदस्थापनेच्या आदेशातील मुद्दा क्र. २ नुसार त्यांची पदोन्नती रद्द होऊन या पदावर संदर्भ क्र. ३ येथील दि.२९.१२.२०२१ च्या आदेशान्वये श्री.संजय कोरडे, प्रशासकीय अधिकारी यांना प्रतिनियुक्तीने पदस्थापना देण्यात आली होती. त्यामुळे श्री.शेंडे हे दि.३१.१२.२०२१ पासून पदस्थापनेविना आहेत. या आदेशान्वये श्री.अखिल नित्यानंद शेंडे, प्रशासकीय अधिकारी, गट-अ यांची खालील प्रमाणे पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| नाव व सध्याची पदस्थापना | पदस्थापना |
|---|---|
| श्री. अखिल नित्यानंद शेंडे, प्रशासकीय अधिकारी, गट-अ (दि.३१.१२.२०२१ पासून पदस्थापनेविना) | प्रशासकीय अधिकारी गट-अ, कृषि आयुक्तालय, पुणे (रिक्त पदी) |

२. श्री.शेंडे यांची वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर येथील वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, गट-अ या रिक्त पदावर लगतच्या निम्न संवर्गातून प्रतिनियुक्तीने केलेली नियुक्ती संपुष्टात आणून दि.२९.१२.२०२१ च्या आदेशान्वये श्री. संजय कोरडे यांना त्या पदावर प्रतिनियुक्ती देण्यात आली होती. त्यामुळे श्री. शेंडे हे दि.३१.१२.२०२१ ते आजतागायत नियुक्तीच्या प्रतिक्षेत आहेत.

३. यास्तव श्री.शेंडे यांना पदस्थापनेविना नियुक्तीच्या प्रतिक्षेत व्यतीत करावा लागलेला दि.३१.१२.२०२१ ते पदस्थापनेपर्यंतचा सदर कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम क्रमांक ९ (१४) (एफ) नुसार आणि वित्त विभाग, शासन निर्णय दि.२ जून, २००३ व वित्त विभाग, शासन अधिसूचना, दि.३ मार्च, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून गणण्यास मान्यता देण्यात येत आहे. श्री.शेंडे यांना उक्त कालावधीचे वेतन व भत्ते अदा करण्याची कार्यवाही कृषि आयुक्तालयाने करावी.

४. उपरोक्त अधिकाऱ्याने तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू व्हावे.

५. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२८१८५३०३५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=a77738ea5ab09abd99367b03338ce9c16517e87d42e99469f031c79ff053aeea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2023.06.28 18:53:45 +05'30'

( ज्योत्स्ना अर्जुन )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
३. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
४. संचालक, वसंतराव नाईक कृषि व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, (वनामती), नागपूर.
५. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
७. संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
८. निवड नस्ती /१६अे

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. अ.मु.स. ( कृषि ) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.